राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

### शासन निर्णय क्रमांकः सीसीआर-०३१३/ प्र.क्र.१४४/२-स

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ५ सप्टेंबर , २०१४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय क्रमांक सीसीआर १४०६/प्र.क्र २४७/ २-स, दि. १७/५/२००६
२. शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १०१२/प्र.क्र.५४४/२-स, दि.१२/१०/२०१२.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र क्र. अर्थ/वढो /व्याज परतावा/ सन १३-१४ / २०१३ , दि. ०२.०८.२०१३.
४. शासन पत्र सम क्रमांक दि. ३०.०८.२०१३.
५. नाबार्ड यांचे पत्र क्र. Policy/२२१३/१५-१/२०१३-१४, दि.२८.८.२०१३.
६. शासन निर्णय समक्रमांक दि.२५.१०.२०१३.
७.शासन निर्णय समक्रमांक दि.३१.१०.२०१३.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाचे शेतकऱ्यांना अल्पमुदत पीक कर्जासाठी ७% व्याजदराने कर्ज पुरवठा करण्याचे धोरण असल्याने, केंद्र शासनाच्या अटी व शर्तीनुसार ज्या ज्या ठिकाणी ७% व्याजदराने अल्पमुदत पीक कर्ज पुरवठा होईल त्या त्या ठिकाणी राज्य शासनाने शेतकऱ्यांना ७% ऐवजी ६% व्याजदराने पीक कर्ज पुरवठा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. या निर्णयाचा राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, राष्ट्रीयीकृत बँका, ग्रामीण बँका आणि खाजगी बँका यांचेकडून अल्पमुदत पीक कर्ज घेणाऱ्या शेतकऱ्यांना फायदा मिळत असून या प्रयोजनासाठी व्यापारी बँकांना १% व्याज परतावा देण्यात येत आहे.

केंद्र शासनाने, बँकांकडून दिल्या जाणाऱ्या रु. ३ लाखापर्यंतच्या अल्पमुदत पीक कर्जावर वार्षिक २% दराने व्याज परतावा संबंधित बँकांना देण्याचा निर्णय घेतलेला आहे. संबंधित बँकांनी शेतकऱ्यांना रु. ३ लाखापर्यंतचे अल्पमुदती पीककर्ज ७% व्याजदराने उपलब्ध करुन दिले तरच त्यांना वार्षिक २% दराने व्याज परतावा देण्यात येत आहे. रुपये ३ लाखांपर्यतच्या अल्पमुदत पीक कर्जाची परत फेड मुदतीत करणाऱ्या शेतकऱ्यांना वार्षिक ३% दराने व्याज सवलत केंद्र शासनाकडून देण्यात येते. याशिवाय राज्य शासनाच्या डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजने अंतर्गत रु. १,००,०००/- पर्यंतच्या पीक कर्जावर शेतकऱ्यांना वार्षिक ३% दराने व्याज सवलत देण्यात येते. वरीलप्रमाणे केंद्र व राज्य शासनाच्या व्याज

परतावा व व्याज सवलत योजनेमुळे रु. १ लाखापर्यंतच्या कर्जावर व्याज दर शून्य टक्के व त्यापुढील रु. ३ लाख मर्यादेपर्यंतच्या कर्जावर व्याजदर २% दराने आकारला जातो.

महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना अल्पमुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी फेरकर्ज उपलब्ध करुन देण्यात येते. जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेकडील अनुत्पादित कर्जाचे (NPA) प्रमाण २०% पर्यंत असल्यास राज्य बँकेकडून ९.५०% दराने फेरकर्ज उपलब्ध करुन देण्यात येते. अशा फेर कर्जावर शासनामार्फत वार्षिक १.२५% दराने व्याज परतावा देण्यात येतो. तसेच जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेकडील अनुत्पादित कर्जाचे (NPA) प्रमाण २०% पेक्षा जास्त असल्यास राज्य बँकेकडून ९.७५% दराने फेरकर्ज उपलब्ध करुन देण्यात येते. अशा फेर कर्जावर शासनामार्फत वार्षिक १.७५% दराने व्याज परतावा देण्यात येतो.

वरीलप्रमाणे केंद्र व राज्य शासनामार्फत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना अर्थसहाय्य मिळाल्यानंतर देखील या बँकांना पीक कर्ज वाटपाच्या व्यवहारात बँकेने वाटप केलेल्या कर्जाच्या सुमारे १.९३% ते २.३३% एवढया रकमेचे नुकसान होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. यामुळे या संदर्भात दि.३०/७/२०१४ च्या मंत्रीमंडळ बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार राज्य शासनमार्फत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना सध्या देण्यात येत असलेल्या व्याज परताव्याच्या धोरणात अंशत: बदल करुन जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्याच्या दृष्टीने या बँकांना व्याज परताव्यापोटी अधिक अर्थसहाय्य देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

शासनामार्फत सध्या जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना १.७५% व १.२५% दराने देण्यात येणाऱ्या व्याज परताव्याच्या धोरणात अशंत: बदल करुन राज्यातील सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना १.५% व वाढीव १.०% असा एकूण २.५% दराने व्याज परतावा प्रत्येक वर्षी मंजूर करण्यात यावा.

वरीलप्रमाणे वाढीव अर्थसहाय्य सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासून करण्यात येणाऱ्या पीक कर्ज वाटपावर अदा करण्यात यावे.

जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना अर्थसहाय्य मंजूर करण्यापूर्वी बँकेच्या प्रस्तावांची संबंधित विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था यांचेमार्फत छाननी करुन बँकांना मंजूर करावयाच्या अर्थसहाय्याचे प्रस्ताव सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावेत. असे प्रस्ताव सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्तरावर मंजूर करण्यात यावेत.

बँकांनी वर्ष २०१३-१४ व त्या पूर्वीच्या पीक कर्ज वाटप हंगामामध्ये केलेल्या पीक कर्ज वाटपावरील व्याज परताव्याबाबतच्या शासनाच्या धोरणाची अंमलबजावणी करण्यासाठी सन २०१४-१५ मध्ये राज्य शासनाने रु.१५० कोटीची योजनेतर ( Non Plan) तरतूद केली आहे. या तरतूदीतून बँकांनी सन २०१३-१४

मध्ये केलेल्या पीक कर्ज वाटपावर १.५% प्रमाणे व्याज परतावा संबंधित बँकांना अदा करण्यात यावा. तसेच बँकांना द्यावयाचा वाढीव १% व्याज परतावा सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात करण्यात येणाऱ्या पीक कर्ज वाटपावर देय राहिल.

जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकाना द्यावयाच्या वाढीव अर्थसहाय्याची व्याप्ती मोठी असल्यामुळे ती खर्चाची नवीन बाब ठरत आहे व त्यामुळे विहित पध्दतीचा अवलंब करुन या खर्चास प्रत्यक्ष विधी मंडळाची मान्यता मिळाल्यानंतर व तद्नुसार तरतूद झाल्यानंतर निधी वितरीत करण्यात येईल.

या तरतूदीतून वरील प्रयोजनासाठी आवश्यकतेनुसार योग्य तो निधी संबंधित बँकांना अदा करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी , सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास पाठवावा. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - १०७ ,सहकारी पतसंस्थांना सहाय्य (०१) (१०) शेतकऱ्यांना अल्पमुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य (२४२५१५०१)" (योजनेत्तर) (दत्तमत्त) ३३ अर्थसहाय्य, या लेखाशिर्षाखालील सन २०१४-१५ या वर्षासाठी उपलब्ध होणा-या तरतूदीमधून खर्च करण्यात यावा.

हा शासन निर्णय मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक ३०/७/२०१४ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरुन व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४२३(अ)/१४/व्यय-२, दि. ३१.०८.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०६१८१५३३६२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajagopal Devara

Digitally signed by Rajagopal Devara
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=110001, st=Maharashtra, cn=Rajagopal Devara
Date: 2014.09.06 18:12:13 +05'30'

**( राजगोपाल देवरा )**
**सचिव (सहकार)**

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

२) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
४) मा. मुख्य सचिव महाराष्ट्र शासन मंत्रालय, मुंबई ३२.
५) मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई ३२.
६) प्रधान सचिव (पुनर्वसन व मदतकार्य ), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) आयुक्त, कृषी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सर्व जिल्हाधिकारी.
११) सह सचिव, भारत सरकार, कृषी मंत्रालय (सहकार विभाग ) कृषी भवन, नवी दिल्ली.
१२) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, प्रादेशिक कार्यालय, पुणे.
१३) मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडीया, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई ४०० ०१८.
१४) उप मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडिया, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, बॉम्बे रिजनल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई ४०० ०१८.
१५) सर्व विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था.
१६) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१७) सर्व कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक.
१८) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक.
१९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मंत्रालय, मुंबई
२०) सर्व कार्यासने, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,
२१) निवड नस्ती- २ स.